सिंधुदूर्ग जिल्ह्यातील कणकवली तालुक्यातील योजनाबाह्य रस्ता ग्रामीण मार्ग म्हणून रस्ते विकास योजना २००१-२१ मध्ये समाविष्ट करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**सार्वजनिक बांधकाम विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः रवियो-२०२३/प्र.क्र.२३/नियोजन-२**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

दिनांक- २१ फेब्रुवारी, २०२३.

पहावे :- १) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे यांचे पत्र जा.क्र. मुअ(कों)/रेखाचित्र शाखा/दर्जोन्नती/३८०, दिनांक-०२/०२/२०२३.

**प्रस्तावना :-**

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, कोंकण यांनी संदर्भाधिन पत्रान्वये सिंधुदूर्ग जिल्ह्यातील कणकवली तालुक्यातील योजनाबाह्य रस्ता ग्रामीण मार्ग म्हणून रस्ते विकास योजना २००१-२१ मध्ये समाविष्ट करणेबाबत प्रस्ताव शासनास सादर केलेला आहे. तसेच प्रशासक, मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सिंधुदूर्ग यांनी सदर रस्ते ग्रामीण मार्ग म्हणून रस्ते विकास योजना २००१-२१ मध्ये समाविष्ट करणेबाबत मागणी केलेली आहे.

सदर रस्त्यांचा होणारा वापर तसेच प्रशासक, मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सिंधुदूर्ग यांची मागणी विचारात घेता, सदर रस्ते ग्रामीण मार्ग म्हणून रस्ते विकास योजना सन २००१-२१ मध्ये समाविष्ट करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन निर्णय :-**

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, कोंकण यांचा प्रस्ताव व प्रशासक, मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सिंधुदूर्ग यांची मागणी विचारात घेऊन सिंधुदूर्ग जिल्ह्यातील कणकवली तालुक्यातील खालील योजनाबाह्य रस्ता **एक विशेष बाब** म्हणून रस्ते विकास योजना सन २००१-२१ मध्ये ग्रामीण मार्ग म्हणून समाविष्ट करण्यात येत आहेत.

| अ.क्र. | प्रस्तावित रस्त्याचे नांव | साखळी क्रमांक | दर्जोन्नत करावयाची एकूण लांबी (कि.मी.) | दर्जोन्नती नंतरचा क्रमांक |
|---|---|---|---|---|
| १. | थोरले मोहुळे (खरातवाडी) ते जांभळीचा कास (कोकरेवाडी पर्यंत) रस्ता. | ०/०० ते ०/८५० | ०.८५० कि. मी. | **ग्रामीण मार्ग-४३६** |
| | **एकुण लांबी** | | **०.८५० कि.मी.** | |

परिणामी रस्ते विकास योजना २००१-२०२१ मधील सिंधूदूर्ग जिल्ह्यातील ग्रामीण मार्ग रस्त्यांच्या **एकूण लांबीत ०.८५० कि.मी.** ने वाढ होवून एकूण लांबी (५१९७.२६८ + ०.८५०) म्हणजेच **५१९८.११८ कि. मी.** इतकी होईल.

हा शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आलेला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२३०२२२१२०८३७३६१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

GANPAT SANDIPAN KACHARE

Digitally signed by GANPAT SANDIPAN KACHARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC WORKS DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=3021bf955fefd71ffad5dd7c97769147f19aca6383a12fed6cff4849d78e224a,
pseudonym=44879507A55BADCE1C62B2D52FC25354CE085DFF,
serialNumber=B5B30AEBA818C77E43E7B8BA4BCA0E9F0D137FEAB0BBCB16CACF2D44087E8A76, cn=GANPAT SANDIPAN KACHARE
Date: 2023.02.22 12:11:57 +05'30'

**( ग. सं. कचरे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) विभागीय आयुक्त, कोंकण.

२) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, कोंकण. (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा)

३) अधिक्षक अभियंता,सार्वजनिक बांधकाम मंडळ, रत्नागिरी. (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करण्यात यावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा)

**प्रत :-**

१) उप सचिव, ग्राम विकास विभाग, बांधकाम भवन,मर्झबान पथ, फोर्ट, मुंबई.

२) जिल्हाधिकारी, सिंधुदूर्ग.

३) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सिंधुदूर्ग.

४) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम (प.) विभाग, सिंधुदूर्ग.

५) संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई.

६) रेखाचित्र शाखा, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय.

७) रस्ते विकास योजना २००१-२०२१ ची नस्ती.

८) निवडनस्ती.